वस्तू व सेवा कर भवन, वडाळा, मुंबई येथील नवीन इमारतीसह शासनाची विविध कार्यालये व शासकीय निवासस्थाने बांधकामासाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्र.पूरक-१०२३/प्र.क्र.२३/वि.प्र.४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
नवीन प्रशासकीय इमारत, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक- २९/०३/२०२३

वाचा :-१) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विकवि-१४२०/प्र.क्र.४५/वि.प्र.४, दि.२२.९.२०२०
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.४.४.२०२२ व दि.८.२.२०२३
३) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विकवि-१०२२/प्र.क्र.२७/वि.प्र.४, दि. २६.५.२०२२
४) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पूरक-१०२२/प्र.क्र.४०/वि.प्र.४, दि.६.१.२०२३

**शासन निर्णय :-**

वस्तू व सेवा कर भवन, वडाळा, मुंबई येथील नवीन इमारतीसह शासनाची विविध कार्यालये व शासकीय निवासस्थाने बांधकामासाठी रु.१७५६.७० कोटी इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र. १ येथील दि.२२.०९.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

२. वस्तू व सेवा कर भवन, वडाळा, मुंबई येथील नवीन इमारतीसह शासनाची विविध कार्यालये व शासकीय निवासस्थाने बांधकामासाठी सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षात मंजूर करण्यात आलेला रु.१२७,१२,२७,०००/- (रु.एकशे सत्तावीस कोटी बारा लक्ष सत्तावीस हजार फक्त) इतका निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

सदर बांधकामासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात जुलै, २०२२ च्या (पावसाळी ) अधिवेशनात पूरक मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेला रु.१०० कोटी ( रुपये शंभर कोटी फक्त) इतका निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

३. वस्तू व सेवाकर भवन, वडाळा, मुंबई येथील नवीन इमारतीसह शासनाची विविध कार्यालये व शासकीय निवासस्थाने बांधकामासाठीच्या सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात मार्च, २०२३ च्या

(अर्थसंकल्पिय) अधिवेशनात पूरक मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेला रु.७५,००,००,०००/- ( रुपये पंच्याहत्तर कोटी मात्र ) इतका निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ येथील शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

५. सदर खर्च "मागणी क्र.जी-८, मुख्य लेखाशीर्ष ४०७०-इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च (००) ८००, इतर खर्च (००) (००) (०१)". महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाद्वारे विक्रीकर कार्यालयाच्या इमारतीचे बांधकाम (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे ( ४०७० ०२४९ ) " या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. उपलब्ध करुन दिलेल्या सदर तरतुदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती वेळोवेळी शासनास सादर करावी.

७. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५२/१४७२, दि.२३.०३.२०२३ तसेच वित्त विभाग/व्यय-७ यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२१५/२०२३/व्यय-७, दि.२६.०३.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात येत असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३२९१८१५२२९३०५ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

MANJUSHA
SALVI

Digitally signed by MANJUSHA SALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f3fd7897fea9717dd9115f782c19536afee03d1736a0283493a8863fadebb45, pseudonym=592D354BA94FD2176EEA4553236CD33EDCD89F9A, serialNumber=2A02139FD3AC94FCBACD18386C5C6655556F2E876E9782822225D5F1AA558DEC, cn=MANJUSHA SALVI
Date: 2023.03.29 18:38:11 +05'30'

**( मंजुषा साळवी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, वस्तू व सेवाकर भवन, मुंबई-४०० ०१०
२) विशेष राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, वस्तू व सेवाकर भवन, मुंबई-४०० ०१०
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१ मुंबई
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५) वित्त विभाग, कक्ष अधिकारी (प्रशा-४/अर्थसंकल्प-१२/व्यय-७)
६) निवडनस्ती.